**गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००)(०५) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे (योजनांतर्गत) (४०७० ०१५१) या लेखाशीर्षाखाली सन २०१७-१८ या वित्तीय वर्षात मंजूर अनुदानापैकी ८० टक्के निधी वितरित करणे व खर्च करणे यांकरिता मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- पोप्रमा-०६१७/प्र.क्र.३४५/एक/पोल-७.**
मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०९ ऑगस्ट, २०१७.

<u>वाचा</u> :- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.०४.२०१७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दिनांक ३०.०६.२०१७.

**शासन निर्णय.**

सन २०१७-१८ या वित्तीय वर्षाच्या अर्थसंकल्पात गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, *इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च,* (००)(०५) *महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे* (योजनांतर्गत) (४०७० ०१५१) या लेखाशीर्षाखाली एकूण रु.३२५ कोटी (रुपये तीनशे पंचवीस कोटी फक्त) इतके अनुदान मंजूर करण्यात आले आहे. त्यापैकी ८० टक्के निधी अर्थात रु.२६० कोटी (रुपये दोनशे साठ कोटी फक्त) वितरित व खर्च करणे यांकरिता, याद्वारे, मंजूरी देण्यात येत आहे.

२. उक्त खर्च हा, गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००)(०५) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे (योजनांतर्गत) (४०७० ०१५१), या लेखाशीर्षाखाली चालू (सन २०१७-१८) वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. उक्त रक्कम अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई, येथून काढून ती महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई, यांना देण्यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई, यांनी उक्त रक्कम पुढीलप्रमाणे खर्च करावी:-

१) अपूर्ण असलेली कामे पूर्ण करण्यासाठी प्रशासकीय/ सुधारित प्रशासकीय मान्यता आदेशांत नमूद केलेल्या रकमांच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.
२) कामाचे नियोजन व प्रगती विचारात घेऊनच निधी उपलब्ध करून द्यावा.

३) त्यानंतर शिल्लक (असल्यास) निधी नवीन कामांना उपलब्ध करुन द्यावा.

५. "महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे" ही नवीन योजना नाही. तसेच, या योजनेचे स्वरुप व व्याप्ती यांमध्ये बदल झालेला नाही.

६. गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, *इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च,* (००)(०५) *महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे* (योजनांतर्गत) (४०७००१५१) या लेखाशीर्षाखाली प्रत्येक वित्तीय वर्षात निधी उपलब्ध करुन देण्यात येत असतो. या लेखाशीर्षाखाली करण्यात आलेल्या खर्चाचे एक वर्षाहून अधिक कालावधीचे संक्षिप्त बिल (Abstract Bill) प्रलंबित नाही. तसेच, *"महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे"* या प्रयोजनासाठी निधी काढण्यासाठी संक्षिप्त बिल सादर करण्यात येत नाही. उक्त लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात मंजूर अनुदानातील कोणत्याही खर्च न केलेल्या रकमा (unspent balances) नाहीत.

७. हा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/ अर्थ-३, दिनांक ३०.०६.२०१७, अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०८०९१८५२०४४०२९ असा आहे. हा आदेश डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.08.09 18:43:08 +05'30'

**( स्वप्नील गोपाल बोरसे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
४) मा. गृह राज्यमंत्री (शहरे/ ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई.

**प्रत:-**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
५) महालेखापाल (लेखापरीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
६) अवर सचिव (अर्थ-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवड फाईल, पोल-७.